मोटार वाहन विभागाच्या वायुवेग पथकांच्या वाहनांसाठी डी.व्ही.आर. (DVR) कॅमेरे GeM पोर्टलवरुन खरेदी करण्यास व त्यापोटी येणा-या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०१२०/प्र.क्र.२१/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : ३१ जानेवारी २०२०

**वाचा :-**

१) उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग- ४, दि.०१.१२.२०१६
२) उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४.०८.२०१७
३) जनहित याचिका क्र.१/२०१६ मध्ये मा.मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांचे आदेश दि.२३.०८.२०१७
४) शासन निर्णय क्र. याचिका-०११८/प्र.क्र.३८४/परि-२, दि.१४.०२.२०१९
३) अपर परिवहन आयुक्त,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र. पआका/का-२अ/सीतना-आधु/DVR कॅमेरा/२०१९/जा. क्र.२९९, दि.०६.०१.२०२०

**प्रस्तावना :-**

मालवाहतूक करणा-या वाहनांनी त्यांच्या क्षमतेपेक्षा जादा मालाची वाहतुक करणा-या वाहनांवर मोटार वाहन अधिनियम १९८८ च्या कलम ११३ व ११४ नुसार वाहन चालक वा वाहनधारक यांचेविरुद्ध कारवाई करण्याची तरतुद आहे. सदर तरतुदींनुसार जादा असलेला माल उतरविल्यानंतर तसेच तडजोड शुल्क भरण्यास तयार असल्यास मोटार वाहन कायदा कलम २०० नुसार तडजोड शुल्क स्विकारण्याची अन्यथा सदर प्रकरण न्यायालयात दाखल दाखल करण्याची कार्यवाही करण्यात येते. तसेच जनहित याचिका क्र.१/२०१६ मध्ये मा. मुंबई उच्च न्यायालय,खंडपीठ नागपूर यांनी दि.२३.०८.२०१७ रोजीच्या आदेशान्वये सार्वजनिक मालमत्तेस नुकसान प्रतिबंध अधिनियम,१९८४ नुसार कारवाई करण्याचे आदेश दिले आहेत. तसेच शासन निर्णय दि.१४.०२.२०१९ अन्वये क्षमतेपेक्षा जादा मालाची वाहतूक करताना दोषी आढळणा-या वाहनांच्या प्रकरणी कारवाई करताना वायुवेग पथकांच्या गाड्यांमार्फत व्हिडियो चित्रिकरण करण्यांसाठी गाड्यांवर कॅमेरे तसेच या गाड्यांमध्ये डी.व्ही.आर. (DVR) कॅमेरे बसविण्याची कार्यवाही करण्याबाबत आदेश दिले आहेत. त्यानुषंगाने संपूर्ण राज्यात जादा मालाची वाहतुक करणा-या वाहनांवर प्रभावी कारवाई करण्यासाठी मोटार वाहन विभागातील वायुवेग पथकांच्या वाहनांना डी.व्ही.आर. (DVR) कॅमेरे उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

## शासन निर्णय :-

राज्यात जादा मालाची वाहतुक करणा-या वाहनांवर प्रभावी कारवाई करण्यासाठी राज्यातील मोटार वाहन विभागाच्या ६७ वायुवेग पथकांच्या वाहनांना ६७ डी.व्ही.आर. (DVR) कॅमेरे GeM पोर्टलवरुन खरेदी करण्यास व त्यासाठी प्रती कॅमेरा सेट अंदाजे रु.४८,६००/- या प्रमाणे येणा-या एकुण रु.३२,५६,२००/- (अक्षरी रुपये बत्तीस लक्ष छप्पन हजार दोनशे फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरची खरेदी करताना प्रथम GeM पोर्टल वरुन करण्यात यावी सदर खरेदी करताना शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या खरेदीबाबतच्या अटी व शर्तीनुसार व GeM पोर्टलवरील अटी व शर्ती नुसार खरेदी प्रक्रियेची कार्यपद्धती अवलंबवावी. सदरहू डी.व्ही.आर. (DVR) कॅमेरे GeM पोर्टलवर उपलब्ध नसल्यास उद्योग, उर्जा व कामगार विभागाने विहित केलेल्या कार्यपद्धती नुसार निविदा प्रक्रिया राबवून खरेदी करण्यात यावी. सदर प्रक्रिया करताना उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि.०१.१२.२०१६ व दि.२४.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. यासाठी येणारा खर्च “मागणी क्र. बी-३, २०४१, वाहनांवरील कर, (०१)(०७) साधनसामग्रीची खरेदी (२०४१ ०३३२) (कार्यक्रम) ५२ यंत्रसामग्री व साधन सामग्री” या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात उपलब्ध असणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला,उपविभाग-दोन, अनुक्रमांक ४, नियम क्रमांक ७ अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१३११७१०५०२७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2020.02.01 17:07:03 +05'30'

**(द.ह.कदम)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर

५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. परिवहन उप आयुक्त (अंमल-२/निरीक्षण/लेखा) परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
९. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती (परिवहन-४)